**मौजे मलठण ता. शिरुर जि. पुणे येथे ग्रामीण रुग्णालयाच्या टप्पा-२ बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१५/प्रक्र-१८८/आरोग्य ३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
नविन मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : २४ जुलै,२०१५

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१२/प्रक्र-१४१/आरोग्य ३, दिनांक १७ जानेवारी,२०१३.
२) शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१३/प्रक्र-७१/आरोग्य ३(अ), दिनांक-२४ जुन,२०१३.
३) सहसंचालक,आरोग्य सेवा, रुग्णालये(राज्यस्तर) मुंबई यांचा प्रस्ताव क्र. संआसे /कक्ष-३/ बांध.मलठणटप्पा २/ ३-४०३६-३७/१५ दिनांक-३१.०३.२०१५.

प्रस्तावना :-

संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये मौजे मलठण ता. शिरुर जि. पुणे येथे ग्रामीण रुग्णालय स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण रुग्णालय मुख्य इमारत व निवासस्थान बांधकामासाठीच्या रु. ६४३.३८ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. संदभार्धीन क्र. ३ च्या पत्रान्वये सदर ग्रामीण रुगणालयाच्या टप्पा- २ बांधकामाचे रु. ४,९९,०८,०९६/- ( रु. चार कोटी नव्याण्णव लक्ष आठ हजार श्यहाण्णव फक्त ) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक व आराखडे आरोग्य सेवा संचालनालयाव्दारे शासनास सादर करण्यात आले आहेत. सदर ग्रामीण रुग्णालय टप्पा-२ बांधकामाच्या अंदाजपत्रकातील संगणकीय चार्जेस ची तरतुद वगळण्यात येऊन रु. ४,८९,५७,४६६/- ( रु. चार कोटी एकोणनव्वद लक्ष सत्तावन हजार चारशे सहासष्ठ फक्त ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

आता या शासन निर्णयान्वये मौजे मलठण ता. शिरुर जि. पुणे येथील ग्रामीण रुग्णालयाच्या टप्पा-२ बांधकामाच्या रु. ४,८९,५७,४६६ /- ( रु. चार कोटी एकोणनव्वद लक्ष सत्तावन हजार चारशे सहासष्ठ ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखडयांना खालील विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे आणि त्याखाली नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| Sr.No. | Name of Work | Amount |
|---|---|---|
| 1) | Sub Estimate No.1 - Main Hospital Building | Rs.4,35,40,832/- |
| 2) | Sub Estimate No.2 - Internal Road | Rs.39,90,688/- |
| | Total | **Rs.4,75,31,520/-** |
| 3) | Add 3 % For Architectural Fees | Rs.14,25,946/- |
| | **Total** | **Rs.4,89,57,466/-** |

अ) सदरील काम जर अर्थसंकल्पाव्यतिरीक्त करावयाचे झाल्यास त्यात ४ टक्के सेंटेज चार्जेसची तरतुद मिळवण्यात यावी.

ब) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सा.बां.विभागाचे संबधित मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे.

क) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पुर्तता करुन घ्यावी.

ड) कामासाठीच्या जागेची उपलब्धता,योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री आरोग्य संस्था प्रमुख यांनी करावी.

इ) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्टया मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या- त्या क्षेत्राच्या सक्षम अधिका-याकडून करण्यात यावी. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उपसंचालकांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

ई) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग,शासन निर्णय क्र. इएनव्ही- २०१३ / प्र.क्र. १७७/ तां.क. १ दि. १० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

सदर बांधकामावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

**लेखाशिर्ष**:-

४२१०- वैद्यकीय सेवा. व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च.

०२- ग्रामीण आरोग्य सेवा

०४ - सार्वजनिक आरोग्य

१०४- सामूहिक आरोग्य केंद्र

(००) (०१)- मोठी बांधकामे

५३- मोठी बांधकामे **(४२१० ०३९१)**

हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौप१२३/इमा-३ दि. २ /७/ २०१५ अन्वये प्राप्त सहमतीने आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र- विअप्र १००८ / प्र.क्र. ७०/२००८/ विनीयम , दिनांक १५ मे २००९ सोबतच्या परिशिष्ट भाग- पहिला उपविभाग - पाच मधील अनुक्रमांक-१,परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२३१५४१५५४३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubha Anil Gadre

Digitally signed by Shubha Anil Gadre
DN: CN = Shubha Anil Gadre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.07.24 12:28:41 +05'30'

**(शु.अ.गद्रे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. अति.संचालक रुग्णालये ( राज्यस्तर ) , आरोग्य सेवा, मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
४. जिल्हा शल्य चिकीत्सक,पुणे .
५. अधिक्षक अभियंता , सा.बां . प्रादेशिक विभाग,पुणे .
६. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम ( पुर्व ) विभाग,पुणे.
७. महालेखापाल १/२ महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा )/ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपुर.
८. वित्त विभाग, (विनीयम कार्यासन / कोषा -५ /अर्थसंकल्प) मुंबई
९. अवर सचिव (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय , मुंबई
१०. निवडनस्ती. (आरोगय-३अ)